**सार्वजनिक बांधकाम विभागातील सचिव (रस्ते) व सचिव (बांधकामे) यांचे मधील कामाचे वाटपाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
सार्वजनिक बांधकाम विभाग
शासन परिपत्रक क्र. एस २१०/२००९/प्र.क्र. २७१/प्रशासन-२,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २९ जुलै, २००९.

**-: परिपत्रक :-**

सार्वजनिक बांधकाम विभागातील सचिव (रस्ते) व सचिव (बांधकामे) यांचे मधील कामाचे वाटप अनुक्रमे परिशिष्ट अ व ब मध्ये दर्शविल्याप्रमाणे राहील आणि सामायिक विषय परिशिष्ट क मध्ये दर्शविल्याप्रमाणे राहतील.

२. सर्व संबंधित अधिकारी/कार्यासन अधिकाऱ्यांनी यापुढे परिपत्रकासोबतच्या परिशिष्ट अ, ब व क मध्ये दर्शविण्यात आलेल्या विषयांच्या वाटपानुसार प्रकरणे सचिव (रस्ते) व सचिव (बांधकामे) यांना सादर करावीत.

३. हे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर (www.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात आलेला असुन त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २००९०७२९१८०४३४००१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( वि. बा. बोंगाडे )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

सहपत्र :- परिशिष्ट अ, ब व क
प्रत,
मा.राज्यपाल यांचे सचिव.
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव.
मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन

# प रि शि ष्ट - क

## सचिव (रस्ते) आणि सचिव (बांधकामे) यांचेकडील सामायिक विषय

१. वर्ग-१ अधिका-यांच्या बदल्या (उप अभियंता / उप विभागीय अधिकारी / उप विभागीय अभियंता / सहायक अभियंता श्रेणी-१/सहायक वास्तुशास्त्रज्ञ वगळून)

२. राजपत्रित व अराजपत्रित अधिका-यांच्या शिस्तभंग विषयक बाबी.

३. खुद्द मंत्रालयीन प्रशासकीय विभागातील सर्व अधिका-यांच्या / कर्मचा-यांच्या सेवा / प्रशासन / आस्थापना आणि रचना व कार्यपध्दती विषयक सर्व बाबी.

४. राष्ट्रीय रस्ते महासभा व भारतीय मार्ग परिवहन विकास संघटना.

५. सल्लागार समिती व केंद्रीय सहाय्य (Consultative Committee and Central Assistance)

६. यंत्रसामुग्री.

७. सार्वजनिक बांधकाम विभागाशी संबंधीत सर्वोच्च न्यायालयाचे निवाडे.

८. विभागीय मुख्य अभियंत्यांच्या व मुख्य वास्तुशास्त्रज्ञ कार्यालयाची निरिक्षणे.

९. खाजगीकरणातून घ्यावयाचे द्रुतमार्गासारखे महाकाय प्रकल्प व खाजगीकरणासंबंधीचे महामंडळ.

१०. पदे निर्माण करणे व ती पुढे चालू ठेवणे यामध्ये फेरबदल किंवा रुपांतर करणे.

११. क्षेत्रीय कार्यालयीन आस्थापना आणि रचना व कार्यपध्दती.

१२. वन जमिनीचे प्रस्ताव पर्यावरण मंत्रालयाशी संबंधित बाबी.

१३. सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत विषयांचे समन्वयाचे सर्वसाधारण काम.

१४. सिमेंट, पोलाद, डांबर व भांडारे इत्यादीबाबतची प्रकरणे.

१५. महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळासंबंधीच्या धोरणात्मक बाबी.

१६. रस्ते व इमारती पंचवार्षिक योजना व वार्षिक योजना, तसेच वार्षिक योजनेतील बजेटींग (Anual Budget & Five years plan)

१७. प्रकरणे निकाली काढण्याबाबतचा कायदा

(शासन परिपत्रक, सा. बां. विभाग, क्रमांक एस २१०/२००९/प्र.क्र. २७१/प्रशासन-२, दिनांक २९ जुलै, २००९ चे सहपत्र)

सचिव (रस्ते) व सचिव (बांधकामे) सार्वजनिक बांधकाम विभाग हयांचेमधील कामाचे वाटप

## प रि शि ष्ट - अ

### सचिव (रस्ते) ( श्री. डी. व्ही. धवड )

१. .वर्ग-१ अधिका-यांच्या बदल्यांची प्रकरणे वगळून सेवा व आस्थापना विषयक सर्व बाबी (उप अभियंता / उप विभागीय अधिकारी, उप विभागीय अभियंता / सहायक अभियंता श्रेणी-१, सहायक वास्तुशास्त्रज्ञ वगळून)

२. बंदरेविषयक बांधकामे.

३. राज्य महामार्ग.

४. जिल्हा रस्ते.

५. लाभक्षेत्र विकास प्राधिकरणांच्या अखत्यारितील रस्ते विकासाची कामे.

६. औद्योगिक विकासासाठी (रस्ते व इमारती इत्यादी) करावयाच्या मूलभूत सोयी.

७. जनजाती उपयोजनांतर्गत रस्ते.

८, रोजगार हमी योजनांतर्गत रस्त्यांची कामे.

९, राज्य परिवहन निधी अंतर्गत रस्ते.

१०. पश्चिम घाटमार्गाची एकात्मीकृत विकास योजना.

११. रस्त्यांचे हस्तांतरण, रेल्वे मार्गावरील पूल व अपघात विषयक बाबी (राष्ट्रीय महामार्ग वगळून)

१२. संबंधित रस्ते व पूल यांच्या कामांना प्रशासकीय मान्यता देणे तसेच सदर कामाच्या मंजुरीपेक्षा झालेल्या अतिरिक्त खर्चास प्रशासकीय मंजुरी देणे.

१३. सार्वजनिक बांधकाम विभागाचे (क्षेत्रीय कार्यालयासह) संगणकीकरण.

१४. गुणवत्ता मंडळ (Quality Circle) संकल्पना.

१५. आय.एस.ओ.१००० (I.S.O.1000)

१६. मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण क्षेत्रातील रस्ते व पुलांची कामे.

१७. पूर्व आणि पश्चिम द्रुतगती महामार्गाबाबत सर्व बाबी.

१८. मुंबई-मुख्यभूमी दुवा प्रकल्प.

१९. एच. आर. डी. ट्रेनिंग

२०. प्रशासकीय सुधारणा/पुर्नरचना ( Reorganization )

२१. महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ यांच्याकडील प्रकल्प व इतर अनुषंगिक बाबी.

२०. वरील विषयाचे संदर्भातील नियोजन, अंदाजपत्रके, सुधारीत अंदाजपत्रके, कार्यक्रम अंदाजपत्रके विनियोजन लेखे, पुर्नविनियोजन, लोकलेखा / अंदाज समिती सारख्या इतर संसदीय समित्या व तत्सम इतर समित्यांची त्यांच्या अहवालासहित सर्व प्रकरणे, न्यायालयीन प्रकरणे, महालेखापालांनी केलेली निरीक्षण प्रतिवेदने, भारताचे नियंत्रक व लेखा परिक्षक यांचे वार्षिक अहवाल, लोकायुक्त / उपलोकायुक्त यांचेकडील प्रकरणे.

# प रि शि ष्ट - ब

## सचिव (बांधकामे) ( श्री. गं. म. कंधारे )

१. उप अभियंता/ उप विभागीय अधिकारी / उप विभागीय अभियंता / सहायक अभियंता श्रेणी-१ / सहायक वास्तुशास्त्रज्ञ या वर्ग-१ तसेच वर्ग-२ पर्यंतच्या अधिकाऱ्यांच्या व कर्मचाऱ्यांच्या सेवा व आस्थापना विषयक सर्व बाबी

२. दुग्धविकास विषयक बांधकामे.

३. राष्ट्रीय महामार्ग.

४. रज्जूमार्ग (Rope Ways)

५. विमानतळ धावपट्टया (Air Port - Air Strips)

६. खाजगीकरणातून करावयाचे इमारती, रस्ते व राष्ट्रीय महामार्गावरील सार्वजनिक बांधकाम विभागातील सर्व प्रकल्प.

७. इमारती.

८. शासनाच्या ताब्यातील जमिनी व खेळांची मैदाने.

९. इमारतींच्या बाबतीत प्रशासकीय मान्यता तसेच सदर कामाच्या मंजुरी पेक्षा झालेल्या अतिरिक्त खर्चास मान्यता देणे.

१०. आमदार निवास, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली, महाबळेश्वर, माथेरान येथील शासकीय निवासस्थानाचे आरक्षण.

११. कंत्राटदारांची नोंदणी

१२. वरील विषयाचे संदर्भातील नियोजन, दरसूची, अंदाजपत्रके, सुधारीत अंदाजपत्रके, कार्यक्रम अंदाजपत्रके विनियोजन लेखे, पुनर्विनियोजन, लोकलेखा / अंदाज समिती सारख्या इतर संसदीय समित्या व तत्सम इतर समित्यांची त्यांच्या अहवालासहित सर्व प्रकरणे, न्यायालयीन प्रकरणे, महालेखापालांनी केलेली निरीक्षण प्रतिवेदने, भारताचे नियंत्रक व लेखा परिक्षक यांचे वार्षिक अहवाल, लोकायुक्त / उपलोकायुक्त यांचेकडील प्रकरणे.